वितरण आदेश क्र.९

**मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,नाथनगर, पैठण औरंगाबाद, या संस्थेच्या लेकव्हयू व प्रशासकीय इमारतीं सभोवताली परिसरामधील रस्त्यांचे कॉंक्रीटीकरण व रंगकामाच्या अंदाजपत्रकास उर्वरित निधी वितरीत करणेबाबत (योजनांतर्गत सन २०१५-१६ )**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०१५/३५३/प्र.क्र.५५ /१५/१२ अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक १ सप्टेंबर, २०१५

**संदर्भ :-**
१. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी२०१५/प्रक्र. ७९ /२०१५/२५, दि.८ एप्रिल २०१५
२. वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.४.२०१५.
३. सार्वजनिक बांधकाम विभाग,शासन निर्णस क्र. संकीर्ण २०१५/प्रक्र.७०/इमा-२ दि. ६ मे,२०१५
४. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक- मप्रविप्रप्र / आस्था/२०१५/९९ दि. १५.३.२०१५ चे पत्र.
५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.मप्रप्र २०१५/प्रक्र.५५/१५/१२-अ दि.४ जून,२०१५
६. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी२०१५/प्रक्र. ७९/२०१५/२५, दि.१८ जून, २०१५.
७ मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक- मप्रविप्रप्र / आस्था/२०१५/२६६, दि. १९.८.२०१५ चे पत्र.

**शासन निर्णय :**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेस सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षाकरिता मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ - प्रशिक्षण (००) (०४) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहाय्यक अनुदान (योजनांतर्गत) (२०७० ०६७५) या लेखाशिर्षाखाली रु. ७०.०० लाख इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र. २ च्या परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पीय अनुदानाच्या ७०% मर्यादेत, रु.४९.०० लाख इतके सहायक अनुदान खर्चाकरिता, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आले आहे. आता संदर्भाधीन क्र. ६ च्या शासन परिपत्रकान्वये सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षाच्या योजनांतर्गत खर्चासाठी संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले आहे.

२. त्यानुसार या संस्थेच्या प्रबोधिनीच्या इमारती सभोवताली परिसरातील रस्त्यांचे कॉंक्रिटीकरण व प्रशासकीय इमारतीच्या कंपाउंड वॉलचे रंगकाम या कामांकरिता एकूण रु. २९,९१,००० /- (अक्षरी रुपये एकोणतीस लाख , एक्याण्णव हजार, फक्त ) इतक्या रकमेच्या प्रस्तावास संदर्भाधीन क्र.५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय व वित्तीय मान्यता देण्यात येऊन, त्यापैकी संदर्भाधीन क्र.१ च्या दि.८.५.२०१५ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार एकूण रु.११.६७ लाख एवढे सहायक अनुदान, लेखा अनुदान म्हणून एप्रिल ते मे २०१५ या दोन महिन्यांच्या खर्चासाठी उपलब्ध करून देण्यात आले होते.

तसेच संदर्भाधीन क्र. ७ च्या पत्रान्वये संस्थेने, या कामाच्या अनुषंगाने, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद यांनी, सदरील अनुदानातून रस्त्यांचे कॉंक्रिटीकरण पूर्ण झाले असे कळविले असून, त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. आता मंजूर झालेल्या अनुदानातून पुढील कामाकरिता उर्वरित निधीची मागणी केली आहे.

३. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, जिल्हा-औरंगाबाद, या संस्थेच्या रस्त्यांचे कॉंक्रिटीकरण व प्रशासकीय इमारतीच्या कंपाउंड वॉलचे रंगकाम या कामासाठी रु.२९,९१,००० /- ( अक्षरी रुपये एकोणतीस लाख, एक्याण्णव हजार, फक्त ) एवढया रकमेच्या प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादित वरीलप्रमाणे मंजूर झालेल्या अनुदानातून अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर योजनांतर्गत खर्चासाठी उपलब्ध असलेल्या निधीपैकी, प्रस्तूत कामासाठी उर्वरित अनुदान **रु. १८,२४,००० /- ( अक्षरी रुपये अठरा लाख, चोवीस हजार, फक्त ) एवढा निधी सहायक अनुदान म्हणून मंजूर करण्यात येत आहे.**

४. यावर होणारा **रु. १८,२४,००० /- ( अक्षरी रुपये अठरा लाख, चोवीस हजार, फक्त )** इतका खर्च मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशीर्ष " २०७०-इतर प्रशासनिक सेवा- ००३ प्रशिक्षण-राज्य योजनांतर्गत योजना (००) (०४) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहायक अनुदान (२०७० ०६७५)-३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखा शिर्षाखाली २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

६. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

७. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ ३, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०११४५४१७१७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2015.09.01 14:57:52 +05'30'

**( अजित देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) मा. अ.मु. स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
५) संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद.
६) उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद
७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद

८) उप कोषागार कार्यालय, पैठण, जि.औरंगाबाद.

९) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई

१०) नियोजन विभाग, (कार्या-१४४२) मंत्रालय, मुंबई

११) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई

१२) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ)